महाराष्ट्र भूमी संपादन,पुनर्वसन व पुनर्स्थापना प्राधिकरण,नागपूर साठी फर्निचर,संगणक व तदनुषंगिक खर्च भागविण्यासाठी पुरवणी मागणीव्दारे मंजूर झालेल्या तरतुदीच्या वितरणाबाबत

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः पूरक २०१७/प्र.क्र.२१३/र-१**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
तारीख: ०८/०१/२०१९

वाचा -

१) निबंधक,महाराष्ट्र भूमी संपादन,पुनर्वसन व पुनर्स्थापना प्राधिकरण,नागपूर यांचे पत्र क्र.आस्था/कार्या.क्र.१/२०१८/१४१, दि.१२.०९.२०१८

२) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र.पूरक-२०१८/प्र.क्र.१३५/अर्थ-३, दि.६.१२.२०१८

३) शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्र.पूरक-२०१८/प्र.क्र.२१९/ब-१, दि.६.१२.२०१८

प्रस्तावना -

**महाराष्ट्र भूमी संपादन,पुनर्वसन व पुनर्स्थापना प्राधिकरण, नागपूर या कार्यालयासाठी १३-कार्यालयीन खर्च व १७-संगणक खर्च या उद्दिष्टाखाली फर्निचर व इतर पायाभूत सुविधेसाठी खर्च भागविण्यासाठी सन २०१८-१९ या आर्थिक वर्षासाठी मागणी केली. यासाठी माहे नोव्हेंबर, २०१८ च्या हिवाळी अधिवेशनात मंजूर झालेल्या पुरवणी मागणीची रक्कम वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे.**

शासन निर्णय -

महाराष्ट्र भूमी संपादन,पुनर्वसन व पुनर्स्थापना प्राधिकरण, नागपूर या कार्यालयासाठी १३-कार्यालयीन खर्च व १७-संगणक खर्च या उद्दिष्टाखाली फर्निचर व इतर पायाभूत सुविधेसाठी खर्च भागविण्यासाठी माहे नोव्हेंबर-२०१८ च्या हिवाळी अधिवेशनात संदर्भ क्र.२ अन्वये रु.५.०० लक्ष इतक्या रकमेची पुरवणी मागणीद्वारे मंजूर करण्यात आलेली आहे. सदर मंजूर रकमेच्या ७० % निधी वितरणास वित्त विभागाने मान्यता दिलेली आहे. त्यापैकी रु ३.५० लक्ष- (रुपये साडेतीन लक्ष) इतका निधी उपलब्ध करुन देण्यात येत आहे. वित्त विभागाने संदर्भ क्र.२ येथील परिपत्रकान्वये मंजूर पुरवणी मागणीची रक्कम बीम्सद्वारे वितरित करण्यास या आदेशान्वये संमती देण्यात येत आहे.

२. या रकमेचा खर्च खालील लेखाशिर्षाखाली माहे नोव्हेंबर-२०१८ च्या हिवाळी अधिवेशनात पुरवणी मागणीद्वारे मंजूर करण्यात आलेल्या तरतुदीनुसार भागविण्यात यावा:-

**मागणी क्रमांक** **सी-५**

**मुख्य/गौण/उपशिर्ष** **२२३५-सामाजिक सुरक्षा व कल्याण**
**०१, पुनर्वसन**
**२०२ इतर पुनर्वसन योजना**
**(०३) प्रकल्पबाधित व्यक्तींची पुनर्वसाहत**
**(०३)(०९) भूसंपादन,पुनर्वसन व पुनर्स्थापना प्राधिकरण (२२३५ सी ०६३)**

**या उदिष्टांतर्गत अर्थसंकल्पित,वितरीत व खर्च झालेला निधी पुढीलप्रमाणे आहे:-**

| उदिष्ट | मूळ अर्थसंकल्पित निधी | एकूण वितरीत निधी (७०%) | खर्च झालेला निधी |
|---|---|---|---|
| १३-कार्यालयीन खर्च | ५.०० | २.७० | १.३२ |
| १७-संगणक खर्च | ०.५ | ०.८० | ०.०० |
| एकूण | ५.०० | ३.५० | १.३२ |

३. उपरोक्त वितरित निधी अर्थसंकल्पीय प्रणालीवर (BEAMS) वितरित करण्याची कार्यवाही वित्त विभागाशी समन्वय साधून अर्थसंकल्प कार्यासनाने (ब-१) त्वरित करावी.

४. सदर शासन निर्णय वित्त विभागाने अनौपचारिक संदर्भ क्र.३४३/व्यय-१०, दि.१४.१२.२०१८ अन्वये दिलेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९०१०८१२०५३३४५१९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Shivaji P Karwar

Digitally signed by Shivaji P Karwar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue and Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=0dbd15a4cda43063e726a7e4b0f36644 3319057727eda4431c6e339fb479ef33, cn=Shivaji P Karwar
Date: 2019.01.08 17:39:03 +05'30'

**(शि.पां.कारवार)**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. विभागीय आयुक्त, नागपूर.
२. निबंधक(तहसिलदार),भूमी संपादन,पुनर्वसन व पुनर्स्थापना प्राधिकरण,नागपूर
३. महालेखापाल ( लेखा व अनुज्ञेयता ) महाराष्ट्र राज्य, मुंबई-१, नागपूर-२.
४. महालेखापाल ( लेखा परीक्षा ) महाराष्ट्र राज्य, मुंबई-१, नागपूर-२.
५. जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर
६. वित्त विभाग, कार्यासन व्यय-१०, अर्थसंकल्प-६, मंत्रालय, मुंबई-३२.
७. महसूल व वन विभाग, कक्ष अधिकारी ब-१/पीएसी, मंत्रालय, मुंबई ३२.
८. निवडनस्ती र-१, कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.

* * *